**जिल्हा निवडणूक कार्यालय, वर्धा ची मासिक देखभाल व दुरूस्तीबाबतची दि.०१.०१.२००७ ते दि. ३१.०३.२०१७ या कालावधीची थकबाकी अदा करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: बीयुडी-२०१८/प्र.क्र. ३९/१८/का.३३**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ३० ऑक्टोबर, २०१८.

**प्रस्तावना:**

जिल्हा निवडणूक कार्यालय, वर्धा हे विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ यांच्या ताब्यातील प्रशासकीय इमारतीत कार्यरत आहे. सदर प्रशासकीय इमारतीत जिल्हा निवडणूक अधिकारी, वर्धा यांच्या कार्यालयास १७१० चौ.फूट इतकी जागा आवंटीत केली असून त्याची दुरूस्ती व देखभाल खर्चाची मासिक रक्कम रू. ४,०००/- इतकी आहे. जिल्हा निवडणूक कार्यालयास आवंटीत क्षेत्राची दिनांक ०१.०१.२००७ ते दिनांक ३१.०३.२०१७ पर्यंतच्या दुरूस्ती व देखभालीबाबत रू. ४,९२,०००/-एवढी थकबाकीची रक्कम अदा करण्यास मंजूरी देण्याचा प्रश्न शासनीच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

जिल्हा निवडणूक कार्यालय, वर्धा यांच्या कार्यालयास विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ यांच्या ताब्यातील प्रशासकीय इमारतीत आवंटीत करण्यात आलेल्या १७१० चौ.फूट इतक्या जागासाठीच्या मासिक रु. ४,०००/- या दरानुसार दिनांक ०१.०१.२००७ ते दिनांक ३१.०३.२०१७ पर्यंतचा दुरूस्ती व देखभालीबाबत रू. ४,९२,०००/-एवढी थकबाकीची रक्कम अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च “मागणी क्रमांक ए-२, २०१५-निवडणूका, १०२-निवडणूक अधिकारी, (००)(०१)निवडणूक अधिकारी (२०१५००१२), १३-कार्यालयीन खर्च” या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. क्रमांक: ५९/२०१८/व्यय-४, दिनांक ०५.०९.२०१८ अन्वये त्यांनी दिलेल्या मान्यतेच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१८१०३०१४३४२७५१०७ असा आहे. सदर शासन निर्णय डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Shubha Sandeep Borkar
Date: 2018.10.31 15:09:22 +05'30'

**( शुभा बोरकर )**
अवर सचिव व उपमुख्य निवडणूक अधिकारी
महाराष्ट्र राज्य

**प्रति,**

१. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता) /(लेखा व परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) /(लेखा व परिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर
३. विभागीय आयुक्त, नागपूर
४. जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, वर्धा
५. उपजिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी, वर्धा
६. जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा
७. अर सचिव, वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई-४०००३२
८. निवड नस्ती/का.क्र.३३